**महावितरण कंपनीला आदिवासी उपयोजनेंतर्गत कृषी पंप ग्राहकांना वीज दरात सवलतीसाठी अनुदान वितरण सन २०२०-२१ मागणी क्र.टी-५ (मुख्यलेखाशिर्ष २८०१५५२५).**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निधिवि-२०२०/प्र.क्र.४०/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २९ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२०प्र. क्र. ०६/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२०/प्र. क्र. ६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२०
३) महावितरण कंपनीचे पत्र क्र. CE(COMM)/SUBSIDY/CSP/११३२५, दिनांक १५ जुन, २०२०.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२०/प्र.क्र.०६/कार्यासन-६, दिनांक २२ ऑक्टोबर, २०२०

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषीपंपधारकांना दरवर्षी सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यात येतो व त्याची प्रतिपूर्ती करण्यासाठी महावितरण कंपनीस अर्थसहाय्य देण्यात येते. यापुढेही आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचीत जमातीच्या संबंधीत कृषीपंपधारक या वैयक्तिक लाभार्थ्यांना वीज दरात सवलत देण्यासाठी आदिवासी विकास विभागाने सन २०२०-२१ करिता महावितरण कंपनीस अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यासाठी रु. २००.०० कोटी इतकी तरतूद केली आहे.

२. सदर तरतूदीपैकी वित्त विभागाच्या संदर्भिय शासन निर्णय क्र.२ मधील सूचनांच्या अनुषंगाने आदिवासी विकास विभागाने २५ टक्केच्या मर्यादेत रू. ५०.०० कोटी इतकी तरतूद संदर्भिय शासन निर्णय क्रमांक-४ अन्वये महावितरण कंपनीस वितरीत करण्यासाठी प्रशासकीय विभाग म्हणून ऊर्जा विभागास उपलब्ध करून दिली आहे. सदर तरतूद रू. ५०,००,००,०००/- (रूपये पन्नास कोटी फक्त) महावितरण कंपनीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना आदिवासी विकास विभागाच्या आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचीत जमातीच्या वैयक्तिक कृषीपंपधारक लाभार्थ्यांना वीज दरात सवलत देण्यासाठी रू. ५०,००,००,०००/- (रूपये पन्नास कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम फक्त अनुसूचीत जमातीच्या लाभार्थ्यांवरच वीज दरात सवलतीपोटी खर्च होईल याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ ने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी. तसेच ज्या उद्देशासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्देशासाठी तो उपयोगात आणला जाईल, याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहील.

३. वरील बाबींचा खर्च मागणी क्र.टी-५, २८०१, वीज, उप मुख्यलेखाशिर्ष-०५ पारेषण व वितरण, गौणशिर्ष ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१)(०१) कृषी विषयक व यंत्रमागविषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण/पारेषण परवानाधारकांना अर्थसहाय्य (कार्यक्रम) (२८०१५५२५) ३३, अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून सह सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रू. ५०,००,००,०००/- (रूपये पन्नास कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभागाच्या दिनांक १६ एप्रिल, २०२० च्या परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०४.०५.२०२० शासन निर्णयानुसार २५% च्या मर्यादेत आहे.

६. सदर निधीच्या लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पुर्व), मुंबई.यांनी आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

७. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२४०/ST-६ दि.१४.१०.२०२० अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७३-व्यय-१४, दि.३१.०७.२०२० अन्वये मान्यता दिल्यानुसार प्रशासकीय विभागाच्या अधिकारात सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१५५८०६९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nanasaheb Rajaram Dhane

Digitally signed by Nanasaheb Rajaram Dhane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, serialNumber=6c39e2858150dbdfcfe6cd25ed08adf59f4d2fd8c1ede1730735f604904bf3bb, cn=Nanasaheb Rajaram Dhane
Date: 2020.11.02 16:10:02 +05'30'

**( ना.रा.ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे (पुर्व), मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई- ४०० ००१
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. आदिवासी विकास विभाग, कार्यासन-०३, ०६ व ०९, मंत्रालय, मुंबई-३२
६. वित्त विभाग, कार्यासन-व्यय-१६/अर्थ-१४, मंत्रालय, मुंबई-३२
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नाशिक,
९. अवर सचिव ( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.३२
१०. अवर सचिव ( ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवड नस्ती, ऊर्जा-७